**पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालयाच्या फोर्ट जॉर्ज किल्ला येथील कार्यालयातील विशेष वस्तु संग्रह दालनामध्ये फायर रेजिस्टींग स्टोरेज कॅबिनेट बसविणे करीता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संग्रह-२०२५/प्र.क्र.९६/सां.का.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०२ जून, २०२५

**वाचा :-** संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांचे पत्र क्र. संग्रह-२०२५/ ६२०/सां.का.३, दि.२३.०४.२०२५.

**प्रस्तावना :-**

पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांचे कार्यालय फोर्ट जॉर्ज किल्ला या संरक्षित स्मारकामध्ये आहे. सदर कार्यालयामध्ये विशेष वस्तु संग्रह दालन (स्ट्राँग रुम) असून, या दालनात निखात निधीमध्ये प्राप्त झालेली विविध धातूंमधील नाणी ठेवण्यात आलेली आहेत. सबब, सदर ऐतिहासिक नाण्यांना सुरक्षित व सुस्थितीत ठेवण्याकरीता फायर रेजिस्टींग स्टोरेज कॅबिनेट बसविण्याकरीता रु.७३,९१,५२०/-- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता व सदर खरेदी प्रक्रिया Gem Portal वरुन राबविण्यास मान्यता देण्याबाबत संचालनालयाने उपर्निर्दिष्ट पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. यानुसार सदर प्रयोजनार्थ प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांच्या फोर्ट जॉर्ज किल्ला येथील कार्यालयातील विशेष वस्तु संग्रह दालन (स्ट्राँग रुम) येथे असणारी विविध धातूंमधील ऐतिहासिक नाणी सुरक्षित व सुस्थितीत ठेवण्यासाठी १८ फायर रेजिस्टींग स्टोरेज कॅबिनेट बसविण्याकरीता येणाऱ्या रु.७३,९१,५२०/- (अक्षरी रुपये त्र्याहत्तर लक्ष एक्याण्णव हजार पाचशे वीस मात्र) (सर्व करांसहीत) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच, सदर खरेदी प्रक्रिया Gem Portal वरुन राबविण्यास देखील मान्यता देण्यात येत आहे.

२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय विअप्र-२०१३/प्र.क्र.२०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) “अ” नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

४. यासाठी होणारा खर्च पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, १०७ वस्तुसंग्रहालये, (०१) शासकीय वस्तुसंग्रहालये (०१) (०२) विविध वस्तू संग्रहालयातील विशिष्ट विभागाची पुनर्रचना व विकास (राज्य) (कार्यक्रम) (२२०५ १३२९) २१-पुरवठा व सामग्री या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२५/ प्र.क्र.४४/ अर्थ-३, दि.७ एप्रिल, २०२५ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांची राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०६०२१८२९४८५७२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PARSRAM NANDRAM BAHURE

Digitally signed by PARSRAM NANDRAM BAHURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=ef62741544bc4d8832eecfb2b7ea295e8a6fcdfe9faffcfda201c87e1c73881b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5FD2A6873F4AE5B1D9EA7DD52E449E02A942EA90145BAEAB72C63CED6D659844, cn=PARSRAM NANDRAM BAHURE
Date: 2025.06.02 18:30:39 +05'30'

**( परसराम न. बहुरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. उपसचिव (सां.का.३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. महालेखापाल -२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती, सां.का.३.